केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत अनुसूचित जाती (SCSP) उपयोजनेंतर्गत सन २०१६-१७ मधील राज्य हिश्श्यापोटी रू.५७९७.७९ लक्ष अनुदान वितरीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः PHD ३००११/प्र.क्र.१०२७/२०१६/आ-७

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
तारीख: १८ जानेवारी, २०१७.

वाचा :-

१) भारत सरकारच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे क्र. G.२७०१७/०२/२०१६-NHM(Finance)/१, दिनांक २७ एप्रिल, २०१६ चे आदेश
२) भारत सरकारच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे क्र. G.२७०१७/०२/२०१६-NHM(Finance)/२, दिनांक २७ एप्रिल, २०१६ चे आदेश
३) भारत सरकारच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे क्र. G.२७०१७/०२/२०१६-NHM(Finance)/३, दिनांक २७ एप्रिल, २०१६ चे आदेश
४) भारत सरकारच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे क्र. G.२७०१७/०२/२०१६-NHM(Finance)/४, दिनांक २७ एप्रिल, २०१६ चे आदेश
५) भारत सरकारच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे क्र. G.२७०१७/०२/२०१६-NHM(Finance)/१, दिनांक १४ जून, २०१६ चे आदेश
६) भारत सरकारच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे क्र. G.२७०१७/०२/२०१६-NHM(Finance)/२, दिनांक १४ जून, २०१६ चे आदेश
७) भारत सरकारच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे क्र. G.२७०१७/०२/२०१६-NHM(Finance)/३, दिनांक १४ जून, २०१६ चे आदेश
८) भारत सरकारच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे क्र. G.२७०१७/०२/२०१६-NHM(Finance)/४, दिनांक १४ जून, २०१६ चे आदेश
९) भारत सरकारच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे क्र. G.२७०१७/०२/२०१६-NHM(Finance)/२, दिनांक १९ सप्टेंबर, २०१६ चे आदेश
१०) भारत सरकारच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे क्र. G.२७०१७/०२/२०१६-NHM(Finance)/३, दिनांक १९ सप्टेंबर, २०१६ चे आदेश

११)भारत सरकारच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे क्र. G.२७०१७/०२/२०१६-NHM(Finance)/४, दिनांक १९ सप्टेंबर, २०१६ चे आदेश

१२) भारत सरकारच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे क्र. G.२७०१७-३४/२०१६-NHM(Finance)/३, दिनांक २१ सप्टेंबर, २०१६ चे आदेश

१३)भारत सरकारच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे क्र. G.२७०१७-३४/२०१६-NHM(Finance)/५, दिनांक २१ सप्टेंबर, २०१६ चे आदेश

१४)भारत सरकारच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे क्र. G.२७०१७-३४/२०१६-NHM(Finance)/६, दिनांक २१ सप्टेंबर, २०१६ चे आदेश

१५)आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांचे क्र.राआसोम/एफएमजी/रा.हि. /९८३४५-३५२/२०१६-१७, दिनांक २२ डिसेंबर, २०१६ चे पत्र.

२०) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय, क्र.साआवि-३००११/प्र.क्र.५२२/२०१५/आ-७ ९ डिसेंबर, २०१६

<u>प्रस्तावना :-</u>

ग्रामीण जनतेस सहजसाध्य, परवडण्याजोगी, कार्यक्षम, उत्तरायी आणि विश्वासार्ह, सर्व गरजू प्रकारच्या आरोग्य सेवा उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने केंद्र शासनाने संपूर्ण देशात एप्रिल २००५ पासून राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान सुरु केले. सन २०१४-१५ मध्ये केंद्र शासनाने आरोग्य विषयक सर्व केंद्र पुरस्कृत योजना एकत्रित करुन त्यास "राष्ट्रीय आरोग्य अभियान" असे नाव दिले. या राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत आता राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान व राष्ट्रीय रोग नियंत्रण कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत योजनांचा समावेश केला आहे. राष्ट्रीय आरोग्य अभियानातील राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेकरीता अनुसूचित जाती (SCSP) उपयोजनेंतर्गत सन २०१६-१७ साठी केंद्र शासनाने ६०% हिस्सा केंद्र हिश्यापोटी पहिला हफ्ता वितरीत केला असून त्यास समरुप राज्य हिश्श्याचे अनुदान राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय :-

राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत कार्यान्वित असलेल्या केंद्र पुरस्कृत योजना व कार्यक्रम याकरीता अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत (SCSP) करीता ४० % राज्य हिश्श्यापोटी सन २०१६-१७ साठी रु. ५७९७.७९ लक्ष इतकी रक्कम वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर प्रस्तावावरील खर्च मागणी क्र.आर-१, २२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य; ०६, सार्वजनिक आरोग्य; ७८९- अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना; पंचवार्षिक योजनांतर्गत योजना; (०१) (१६) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान केंद्र पुरस्कृत योजना (राज्य हिस्सा ४०%) (२२१०E४३७) - ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१६-१७ साठी मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रकमेचे देयक त्यांनी कोषागारात सादर करुन विहित केलेल्या बाबीवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम संबंधीत कार्यक्रम अधिकाऱ्याकडे सुपूर्द करावी. यासाठी सहसंचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२३०१६४८४४८११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Tanbaji Uike

Digitally signed by Ashok Tanbaji Uike
DN: CN = Ashok Tanbaji Uike, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2017.01.18 17:01:48 +05'30'

**(अ. ता. उईके)**
**महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव**

प्रत,

१. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. अति. संचालक, कु.क. कार्यालय, पूणे
६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे .
७. सहायक संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे
८. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
११.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. वित्त विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१३.कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग .
१४.निवडनस्ती (आरोग्य -७) .